**नवीन चंद्रपूर शहराचा विकास- इरई नदीवरील पुलाच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- नविचं-२०१६/प्र.क्र.४९/गृनिधो-१**
नविन प्रशासन भवन, ६ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २७ फेब्रुवारी, २०१७.

वाचा :- १) नगर विकास विभाग शासन अधिसूचना क्रमांक TPS-२२२४/४७१/CR-१५/C/UD-९, दिनांक ३० जून, १९९८.
२) महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांचे क्र.जा.क्र. एमएच/मु.अ.-२/का.अ.-२/प्रा./नस्ती क्र.७०३/६१२/२०१६, दिनांक ४ ऑक्टोंबर, २०१६ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

सन १९९८ मध्ये शासनाने चंद्रपूर जिल्हयातील १३९.७१ हेक्टर इतक्या क्षेत्रावर नवीन चंद्रपूर शहर बसविण्याचा निर्णय घेतला. नवीन चंद्रपूर येथील अधिसूचित विभागात विकासाची कामे करण्यासाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाची विशेष नियोजन प्राधिकरण म्हणून नियुक्ती केली आहे. या योजनेच्या विकास आराखडयास नगर विकास विभागाने दिनांक ३० जून, १९९८ च्या अधिसूचनेन्वये मंजूरी दिलेली आहे. आतापर्यंत नवीन चंद्रपूर येथील भूसंपादन व बाहय विकासाच्या कामासाठी म्हाडाने रु.१८१.२० कोटी इतका निधी खर्च केला असून त्याची प्रतिपुर्ती शासनाने महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणांस केलेली आहे.

सदर योजनेअंतर्गत इरई नदीवर पुल बांधण्यासाठी संदर्भांकीत पत्रान्वये महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाने सादर केलेल्या रु.६५१९.५० लाखाच्या प्रस्तावास सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या तांत्रिक मंजूरीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाकडून प्राप्त झालेल्या इरई नदीवरील पुलाच्या बांधकामाच्या प्रस्तावाच्या छाननीनंतर, रु.**६५१९.३० लक्षच्या** प्रस्तावास सार्वजनिक बांधकाम विभागाने तांत्रिक मान्यता दिलेली आहे. सोबत जोडलेल्या परिशिष्टातील कामासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने काम सुरु करण्यापुर्वी खालील बाबींची पुर्तता करण्यात यावी या अटींस अधीन राहून सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यांत येत आहे.

१) अंदाजपत्रकातील दराबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाचे परिपत्रक क्रमांक-डिएसआर१०९०/सीआर-६४५३/नियो-३, दिनांक १४ जुलै, १९९३ व जीईएन-१०२००१/सीआर-३/नियो-३, दिनांक २२ फेब्रुवारी, २००१ मधील तरतुदींचे अनुपालन झाले असल्याबद्दल खात्री करुन घेण्यात यावी.

२) डांबरीकरणाच्या तरतुदी सार्वजनिक बांधकाम विभाग परिपत्रक क्रमांक-संकीर्ण २०७/प्र.क्र.११६/रस्ते-१, दिनांक ४ डिसेंबर, २००९ व क्रमांक संकीर्ण-२०१४/ प्र.क्र.०६/रस्ते-१, दिनांक २६ मे, २०१४ व दिनांक ७ ऑगस्ट, २०१४ नुसार आहेत याची खात्री तांत्रिक मान्यता प्रदान करण्या-या अधिका-यांने करावी.

३) काँक्रीटच्या संकल्पनास तांत्रिक मंजूरी प्राधिका-यांची मंजूरी घ्यावी.

४) तांत्रिक मान्यता प्रदान करण्यापुर्वी द्रविक गणिते पुनश्च: तपासण्यात यावीत. त्याप्रमाणे संकल्पन निश्चित करण्यात यावे.

५) वाहतूक अडथळयांचे प्रमाण अनुज्ञेय राहील याची खातरजमा करण्यात यावी.

६) रस्त्यांच्या पृष्ठभागावरुन पावसाच्या पाण्याचा निचरा होण्याच्या दृष्टीने योग्य आकाराच्या व उतारात साईट गटर्स करण्यात याव्यात.

७) सदरील कामांस वनजमीन / पर्यावरण विभागाची मान्यता आवश्यकता असल्यास संबंधीत विभागाच्या पुर्वपरवानगी घेतल्याशिवाय काम हाती घेण्यात येऊ नये.

८) इरई नदीवरील पूलाच्या सर्वसाधारण आखणीस सक्षम अधिका-यांची मंजूरी प्राप्त केल्यानंतरच अंदाजपत्रकास तांत्रिक मंजूरी प्रदान करण्यात यावी.

९) रस्त्यांच्या भौमित्तिक मानकांबाबत शासन परिपत्रक क्रमांक बीडीएम-१०८७/ सीआर-५३०६/नियो-३, दिनांक १३ मे, १९८८ मधील तरतुदींचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) अनुदान ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेले आहे त्याच कारणांसाठी त्याचा विनियोग करणे आवश्यक आहे. जर रक्कम ज्या कारणांसाठी वितरीत केली आहे, त्या कारणासाठी वापरली नाही तर सदर रक्कम प्राधिकरणाकडून व्याजासह वसूल करण्यांत येईल.

११) उपअभियंता, विशेष प्रकल्प, चंद्रपूर, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी योजनेअंतर्गत होणा-या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

१२) या अनुदानाविषयीचे लेखे महालेखापाल यांनी मागविल्यास ते त्यांच्या माहितीकरीता / पाहणीकरीता सादर करण्यात यावे.

२. प्रस्तुत कामास तांत्रिक मंजूरी देण्यापुर्वी सदर रस्ता यासाठी लागणारी जमीन या प्राधिकरणाच्या ताब्यात आहे याची खातरजमा करुन घ्यावी.

३. प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकात प्रत्येक दराचे वर्णन / दर / दर पृथ:करणातील गृहीत धरलेली अंतरे व अनुषंगीक इतर बाबीं तांत्रिक मान्यता प्रदान करण्यास सक्षम अधिका-यांनी त्यांच्या पातळीवर तपासणे अनिवार्य आहे. या संदर्भात शासनाचे कोणतेही उत्तरदायित्व असणार नाही.

४. तांत्रिक मान्यता प्रदान करतांना प्रशासकीय मान्यतेतील वाव अन्य कोणत्याही योजनेत / कार्यक्रमात समाविष्ट नाही, याची खातरजमा तांत्रिक मान्यता प्रदान करण्यास सक्षम अधिका-यांने करावी.

५. या बाबींवर होणारा खर्च, "२२१६ गृहनिर्माण ८०-सर्वसाधारण-१०३ गृहनिर्माण मंडळ इत्यादींना सहाय्य पंचवार्षिक योजनाअंतर्गत योजना (०३) (०६) नवीन चंद्रपूर शहाराच्या विकसासाठी, ३१-सहाय्यक अनुदाने (२२१६ ११०२) (मागणी क्र.क्यु-३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत येवून, तो सन २०१६-१७ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर तरतुदींतुन भागविण्यांत यावा.

६. वरील शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौचारिक संदर्भ क्र.२/१४७२, दिनांक ७ जानेवारी, २०१७, वित्त विभागाचा अनौचारिक संदर्भ क्र.५/व्यय-३, दिनांक २१ जानेवारी, २०१७ तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौचारिक संदर्भ क्र.२३०८४१/रस्ते, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संकेतांक २०१७०२२७१८००५५८९०९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Meenal Dilip Pednekar

Digitally signed by Meenal Dilip Pednekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=d3ff92ae3a8e5839988ca45db0eee3f448a9c88472103709dc1e857938d39c04, cn=Meenal Dilip Pednekar
Date: 2017.02.27 18:05:39 +05'30'

**( मीनल पेडणेकर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
२) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
३) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१.
४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर.
५) जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, चंद्रपूर
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर.
७) उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (वि.प्र.), चंद्रपूर उपविभाग, चंद्रपूर.
८) मुख्य अधिकारी, नागपूर गृहनिर्माण क्षेत्रविकास मंडळ, नागपूर.
९) खाजगी सचिव मा. मंत्री (गृहनिर्माण), मंत्रालय, मुंबई
१०) खाजगी सचिव मा. राज्यमंत्री (गृहनिर्माण), मंत्रालय, मुंबई
११) वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१.
१२) अधिदान व लेखा अधिकारी, बांद्रा, मुंबई
१३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१४) अवर सचिव (रोखशाखा/अर्थसं-१), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१५) कार्यासन अधिकारी (नियोजन-३), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१६) कार्यासन अधिकारी (१४७२), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) कार्यासन अधिकारी (व्यय-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) निवडनस्ती (गृनिधो-१).

## "परिशिष्ट"

| Sr.No | Particulars | Amount |
|---|---|---|
| 1 | Construction Cost as per abstract | 564298009.00 |
| 2 | Add 4% for Contingencies Charges | 22571920.00 |
| 3 | Add 2% for Computerization Charges | 11285960.00 |
| 4 | Add 1% for Insurance Charges | 5642980.00 |
| | | **603798869.00** |
| 5 | Add 18 Poles @ 55000 for Shifting and reinstallation of Electric Line | 990000.00 |
| 6 | Add 40 Street Light & High Mast Light @ 45000/- & 500000/- Nos Respectively | 3889900.00 |
| 7 | Add 2% for Architectural treatment | 11706903.00 |
| 8 | Add L.S. for arboriculture & Ornamental plantation | 500000.00 |
| | | **620885672.00** |
| 9 | Add 5% for Centage Charges | 31044284.00 |
| | | **651929956.00** |
| 10 | **Total Cost** | **651930000.00** |

Meenal Dilip Pednekar

Digitally signed by Meenal Dilip Pednekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=d3ff92ae3a8e5839988ca45db0eee3f448a9c88472103709dc1e857938d39c04, cn=Meenal Dilip Pednekar
Date: 2017.02.27 18:07:04 +05'30'

**( मीनल पेडणेकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.